**विद्यापीठांचे विभाजन करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१०/( १०६ /१०)/विशि-४(भाग-३)
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २३ ऑगस्ट, २०१०

**प्रस्तावना :** देशाची प्रगती होण्यासाठी तसेच जागतिकीकरणाच्या स्पर्धेमध्ये टिकून राहण्यासाठी नागरिकांस दर्जेदार शिक्षण मिळणे आवश्यक आहे. भविष्यातील सुज्ञ नागरिक घडविण्यामध्ये उच्च शिक्षणाचा मोलाचा वाटा आहे. त्यामुळे उच्च व तंत्रशिक्षणाचा दर्जा उंचावणे व त्याची गुणवत्ता वाढविणे अत्यावश्यक आहे. महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील तरतुदीनुसार राज्यातील शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी आवश्यक त्या सर्व उपाययोजना करण्याची सर्व जबाबदारी विद्यापीठाचे कुलगुरु व त्यांचे सर्व अधिकारी यांची असते. उच्च शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी, विद्यापीठ अनुदान आयोग, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नॅशनल कौन्सिल फॉर टिचर्स एज्युकेशन इत्यादी प्राधिकरणाकडूनसुध्दा वेळोवेळी निर्देश देण्यात येतात.

२. तथापि, गेल्या काही वर्षापासून असे निदर्शनास आले आहे की, एका बाजूला जागतिक स्तरावर उच्च शिक्षणाचा दर्जा उंचावत असताना, दुसऱ्या बाजुला राज्यातील उच्च शिक्षणाचा दर्जा मात्र घसरत आहे. याबाबत समाजातील विविध घटक व तज्ञांकडून व तसेच मा.कुलपती यांच्या अध्यक्षतेखालील कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत (जे.बी.व्ही.सी.) वेळोवेळी चिंता व्यक्त करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे या संदर्भात मा.न्यायालयानेही वेगवेगळया याचिकांमध्ये निर्णय देताना उच्च शिक्षणाच्या दर्जात्मक व गुणात्मक बाबींबाबत चिंता व्यक्त केली आहे.

३. मा.कुलपती यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत (J.B.V.C.) तसेच मा. उच्च न्यायालयाने निरनिराळया याचिकांमध्ये निर्णय देताना उच्च शिक्षणाचा दर्जा वाढविण्यासाठी व शिक्षणाच्या जागतिकीकरणाच्या स्पर्धेत राज्यातील विद्यार्थी टिकून रहावेत यासाठी योग्य ती पावले उचलण्यासाठी शासनाला व विद्यापीठांना आदेशित केले आहे.

४. राज्यातील उच्च शिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता ढासळण्याचे एक महत्वाचे व मुख्य कारण म्हणजे अकृषी विद्यापीठांशी संलग्नित असलेल्या महाविद्यालयांची वाढती संख्या. राज्यात सद्या अकृषि

विद्यापीठांतर्गत सुमारे ४००० पेक्षा अधिक संलग्नित महाविद्यालये (व्यावसायीक महाविद्यालयांसह) आहेत. परंतु या संलग्नित महाविद्यालयांचे विद्यापीठनिहाय वितरण हे असमान आहे उदा. नागपूर, पुणे व मुंबई विद्यापीठांमधील संलग्नित महाविद्यालयांची संख्या ही ५०० पेक्षा अधिक आहे. तर इतर विद्यापीठांमधील संलग्नित महाविद्यालयांची संख्या ही २५०-३०० च्या आसपास आहे. त्यामुळे विद्यापीठांमधील अवास्तव महाविद्यालयांच्या संख्येमुळे विद्यापीठ व विद्यापीठाचे प्रशासकीय अधिकारी व कर्मचारी यांचा अधिकांश वेळ हा या संलग्नित महाविद्यालयातील विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेणे, त्यांचे निकाल लावणे त्याचप्रमाणे या महाविद्यालयांचे इतर प्रश्न सोडवण्यात खर्च होतो. यामुळे विद्यापीठांना उच्च शिक्षणाचा दर्जात्मक व गुणात्मक विस्तार व विकास, संशोधन व पदव्युत्तर अभ्यासक्रमांच्या विकासाकडे योग्य प्रमाणात लक्ष देता येत नाही. त्यामुळे ज्या विद्यापीठांमध्ये संलग्नित महाविद्यालयांची संख्या ५०० पेक्षा अधिक आहे. त्यांचे विभाजन करण्याबाबत वारंवार वेगवेगळया स्तरावरुन राज्यशासनास सुचना प्राप्त होत असतात. त्याचप्रमाणे मा. मंत्री (उ.व तं.शि) यांनी विधानमंडळात पुणे, मुंबई या अतिरिक्त ताण असलेल्या विद्यापीठांचे विभाजन करण्याचे सुतोवाच केले आहे.

राष्ट्रीय ज्ञान आयोगाने (NKC) १५० महाविद्यालयांसाठी एक विद्यापीठ (१५०:१) अशी शिफारस केलेली आहे. राष्ट्रीय ज्ञान आयोगाच्या या निकषांच्या आधारावर राज्यामध्ये सध्या अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांसाठी आणखी ८ अतिरिक्त विद्यापीठे व सन २०१५ पर्यन्त आणखी १८ नवीन विद्यापीठे स्थापन करावी लागतील. या सर्व गोष्टींचा विचार करुन राज्यात नवीन विद्यापीठे स्थापन करावी किंवा विद्यापीठांचे विभाजन करावे किंवा पदवी स्तरावरील विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेण्यासाठी एक स्वतंत्र मंडळ स्थापन करावे व पदव्युत्तर आणि संशोधनाचे कार्य विद्यापीठाकडे ठेवावे याबाबत शासनास सल्ला देण्यासाठी एक समिती घटीत करण्याचा प्रस्ताव राज्यशासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार राज्यशासनाने खालील समिती घटीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

## <u>शासन निर्णय</u>

५. राज्यात उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखाली एकूण १३ विद्यापीठे असून, यामध्ये १० पारंपारीक विद्यापीठे, १ तांत्रिक विद्यापीठ, १ संस्कृत विद्यापीठ व १ मुक्त विद्यापीठ यांचा समावेश आहे. परंतु या विद्यापीठांपैकी मुंबई, पुणे व नागपूर विद्यापीठांमधील महाविद्यालयांची संख्या ही साधारणतः ५०० च्या वर आहे. तर विद्यार्थी संख्या ५ लाखाच्यावर आहे. इतर विद्यापीठांतील महाविद्यालयांची व विद्यार्थ्यांची संख्या ही तुलनेने कमी आहे.

| विद्यापीठांचे नांव | संलग्नित महाविद्यालयांची संख्या | विद्यार्थी संख्या |
|---|---|---|
| पुणे विद्यापीठ | ५८७ | ४.५० लक्ष |
| नागपूर विद्यापीठ | ७५९ | २.५० लक्ष |
| मुंबई विद्यापीठ | ६३० | ६.५० लक्ष |

वरील विद्यापीठातील महाविद्यालये व विद्यार्थ्यांची संख्या पाहता या विद्यापीठांवर शैक्षणिक व प्रशासकीय कामकाजाचा अतिरिक्त ताण पडत आहे. त्यामुळे या विद्यापीठांना इतर बाबींकडे उदा. संशोधन, उच्च शिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता, विद्यार्थ्यांच्या समस्या इत्यादी कडे योग्यप्रमाणात लक्ष देता येत नाही. यामुळेच या अतिरिक्त ताण असलेल्या विद्यापीठांचे विभाजन करुन राज्यात नवीन विद्यापीठे स्थापन करावी किंवा पदवी स्तरावरील विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेण्यासाठी एक स्वतंत्र मंडळ स्थापन करावे व पदव्युत्तर आणि संशोधनाचे कार्य विद्यापीठाकडे ठेवावे याबाबत शासनास सल्ला देण्यासाठी खालील समिती घटीत करण्यास राज्यशासन मान्यता देत आहे.

| अ.क्र | सदस्यांचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ. राम ताकवले | अध्यक्ष |
| २ | श्री. अशोक कोळसकर | सदस्य |
| ३ | श्रीमती कुमूद बन्सल | सदस्य |
| ४ | श्री. गजानन एकबोटे | सदस्य |
| ५ | प्रा. मधुकर गायकवाड | सदस्य |
| ६ | डॉ. राम माने | सदस्य |
| ७ | डॉ. उदय साळुंके | सदस्य |
| ८ | डॉ. राजन वेळूकर | निमंत्रक व सदस्य |
| ९. | श्री.प्रताप बोराडे | सदस्य |

६. **समितीची कार्यकक्षा :-**

समितीने विद्यापीठे कार्यक्षम बनविण्यासाठी योग्य त्या व अंमलबजावणी करता येतील अशा सर्व उपाययोजनांचा विचार करावा. हे करतानाच खालील उपाययोजनांचा सुध्दा विचार करावा.

(i) विद्यापीठे कार्यक्षम होण्यासाठी इतर राज्यामध्ये / विदेशामध्ये अवलंब करीत असलेल्या उपाययोजना विचार करावा.

(ii) विद्यापीठाशी संलग्नित महाविद्यालयांची संख्या, विषयानुसार स्वतंत्र विद्यापीठ स्थापन करावे की, पदवी अभ्यासक्रमासाठी व पदविका शिक्षण देणाऱ्या महाविद्यालयांचे कामकाज पाहण्यासाठी स्वतंत्र मंडळाची इ. ची स्थापन करावी..

(iii) समितीने अशी शिफारस करतांना व्यवहार्य (Practical), वस्तुनिष्ठ (Physical) व अंमलबजावणी करता येतील, अशा शिफारशी कराव्यात.

(iv) समितीने उत्तम राज्यकारभाराची पध्दती (Good Governance Practices) सुध्दा शिफारस करावी.

(v) समितीने सध्या केवळ अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांचा विचार न करता GER वाढविण्यासाठी नव्याने स्थापन कराव्या लागणा-या महाविद्यालयांचासुध्दा विचार करावा व त्यासाठी किती आणि कशी विद्यापीठे स्थापन करावीत, याची शिफारस करावी.

(vi) याबरोबरच वरील शिफारशी करतांना समितीने त्यांच्या कामकाजाची रुपरेषा स्वत: ठरवावी.

(vii) समितीला देशांतर्गत आवश्यकतेप्रमाणे दौरे करणे व संबंधित लोकांना चर्चेसाठी बोलाविण्याची मुभा राहील.

(viii) समितीने आपला अंतरीम अहवाल ३ महिन्यात उच्च स्तरीय मुख्य समितीस सादर करावा.

(xi) मुख्य समितीला कार्यकारी समितीने सादर केलेल्या अहवालावर चर्चा करुन सदर अहवालामध्ये योग्यत्या सुधारणा सुचवाव्यात. या सुचनानुसार कार्यकारी समितीने अवश्यकते फेरबदल करुन समितीने आपला अंतिम अहवाल मुख्य समितीस १ महिन्यात सादर करावा.

(x) समितीच्या सर्व बैठकीस उच्च व तंत्र शिक्षण विभागातील उपसचिव (विद्यापीठ शिक्षण) हे शासनाचे प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहातील.

(xi) समितीला अवश्यक ती सर्व प्रशासकीय मदत मुंबई विद्यापीठाने उपलब्ध करुन दयावी. तसेच सदर समितीसाठी बैठक भत्त्यासह येणारा संपूर्ण खर्च मुंबई विद्यापीठाने त्यांच्या निधीतून विद्यापीठाच्या नियमावली प्रमाणे करावा.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्रमांक २०१००८२५२०४४३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

(महेश पाठक )
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
३) समितीचे सर्व मा. सदस्य
४) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) मा. मंत्री ,(उवतंशि), यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्यमंत्री, (उ.व तं. शि.), यांचे खाजगी सचिव.
७) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
८) परिक्षा नियंत्रक, सर्व अकृषी विद्यापीठे
९) सर्व संचालक, विद्यापीठ व महाविद्यालय विकास मंडळ,
१०) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
१२) सर्व सहसचिव /उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी , उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१३) निवड नस्ती विशि-४